**राज्य उत्पादन शुल्क विभागातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमआयएस-१११८/प्र.क्र.२३२/राऊशु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - १४ डिसेंबर, २०२१.

<u>संदर्भ:</u>- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दि.३०.०६.२०२०.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.३०.०६.२०२०.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७.११.२०२०.
५) सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२८.१०.२०२१.
६) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क कार्यालयाचे पत्र क्र.इएसटी-१३२०१८/०५/ २अ२, दि.१७.१२.२०२० व दि.०९.०१.२०२०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१८ (चेअरमन आणि मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुद्ध जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिकामध्ये दि.०६.०७.२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही असा निर्णय दिलेला आहे. मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३१४०/२००८ मध्ये दि.२८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.१ वरील आदेशान्वये अशा अधिकारी / कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची कार्यवाही करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यास अनुसरुन राज्य उत्पादन शुल्क विभागातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची व त्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१८ व इतर याचिकामध्ये दि.०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात राज्य उत्पादन शुल्क विभागातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या व सद्य:स्थितीत कार्यरत असलेल्या सोबतच्या **विवरणपत्र-अ** मध्ये नमूद सर्व अधिकारी / कर्मचारी यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१८ व इतर याचिकामध्ये दि.०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात राज्य उत्पादन शुल्क विभागातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या व सद्य:स्थितीत कार्यरत असलेल्या सोबतच्या **विवरणपत्र -ब** मध्ये नमूद अधिकाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यास व त्यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, म.रा., मुंबई यांनी परिशिष्ट-ब मधील संबंधित अधिकाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.१२.२०१९ मधील परिशिष्टातील नमुन्यानुसार नियुक्ती आदेश तात्काळ निर्गमित करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी/ कर्मचारी यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.१२.२०१९, दि.२७.११.२०२० व दि.२८.१०.२०२१ नुसार तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, ज्यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत तात्पुरत्या स्वरुपात नेमणूक देण्यात येत आहे. तसेच, सदर नियुक्त्यांना अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर, पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते, त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/ १६-ब, दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दि.३०.०६.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२१४१७१४२६५३२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandeep Gorakhnath Dhakane

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, cn=Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2021.12.14 17:16:34 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) महालेखापाल १/ २, (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
९) निवडनस्ती (राउशु-१)

**गृह विभाग, शासन निर्णय, क्र. एमआयएस-१११८/प्र.क्र.२३२/राऊशु-१, दि.१४ डिसेंबर, २०२१**
**सोबतचे विवरणपत्र-अ**

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | गट | अधिसंख्य पदावर वर्ग केल्याचा दिनांक | संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात येणाऱ्या अधिसंख्य पदाचे पदनाम |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.प्रकाश पी.कमळे | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| २ | श्री.शामसुंदर पांडुरंग कोळी | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ३ | श्री.सुभाष लक्ष्मण मांजरे | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ४ | श्री.महेंद्र दिनकर झुंजार | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ५ | श्री.चंद्रकांत कु.वाघमारे | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ६ | श्री.संजय लछन्ना बोडेवार | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ७ | श्री.दत्तात्रय ओंकार कुटेमाटे | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ८ | श्री.सुभाष किसन बाविस्कर | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ९ | श्री.जितेंद्र के माझगावकर | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| १० | श्री.शिवाजी रंगराव कोरे | क | १८.११.२०२० | दुय्यम निरीक्षक |
| ११ | श्री.विशाल चिंतामण बस्ताव | ड | २५.०२.२०२० | जवान |
| १२ | श्री.संदीप आत्माराम आडी | ड | २५.०२.२०२० | जवान |
| १३ | श्री.कैलास महादेव नाखवा | ड | २५.०२.२०२० | जवान |
| १४ | श्री.राहूल बळीराम बोईनवाड | ड | २५.०२.२०२० | जवान |
| १५ | श्री.माधव देविदास माडे | ड | १८.०२.२०२० | जवान |
| १६ | श्री.शशिकांत चंद्रकांत भाट | ड | १८.०२.२०२० | जवान |
| १७ | श्री.बालाजी बळीराम चाळणेवाड | ड | ०३.०३.२०२० | जवान |
| १८ | श्री.प्रविण प्रकाश जाधव | ड | ०३.०३.२०२० | जवान |
| १९ | श्री.गोविंद जानू कोळी | ड | ३१.१२.२०१९ | जवान |
| २० | श्री.गुरुसिध्दप्पा चंद्रशाह बेळ्ळे | ड | ३०.१२.२०१९ | जवान |
| २१ | श्री उदय नारायण पंची | ड | ३०.१२.२०१९ | जवान |
| २२ | श्री गणेश पंढरीनाथ झिटे | ड | ३०.१२.२०१९ | जवान |
| २३ | श्री.दिपक लक्ष्मण घावटे | ड | ०२.०१.२०२० | जवान |

****

**गृह विभाग, शासन निर्णय, क्र. एमआयएस-१११८/प्र.क्र.२३२/राऊशु-१, दि.१४ डिसेंबर, २०२१**
**सोबतचे विवरणपत्र-ब**

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | गट | संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात येणाऱ्या अधिसंख्य पदाचे पदनाम |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती रेखा भा. पाटील | ब | सहाय्यक आयुक्त |
| २ | श्री.दिलीप बापू कोळी | ब | निरीक्षक |
| ३ | श्री.संभाजी आ.कोळी | ब | निरीक्षक |

*****